राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत मौजे वाकळघर ता. श्रीवर्धन जि. रायगड या वाढीव दरडोई खर्च असलेल्या पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्र.ग्रापापु-१२१८/प्र.क्र.१४७/पापु- ०६**
**मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**तारीख: २० जून, २०१८**

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांकः पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. ग्रापाधो १२०८/प्र.क्र.५२/पापु-७ दिनांक ९.१०.२०१३.

२) शासन निर्णय क्रमांकः ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठीच्या सुधारित मार्गदर्शक सुचनांबाबतचा शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७,दि. ०९/०७/२०१४

३) शासन निर्णय क्रमांकः ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या लोकवर्गणीबाबतचा शासन निर्णय क्र.ग्रापाधो-१११४/प्र.क्र.२२/पापु-०७,दि. ०९/०७/२०१४

४) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या देखभाल दुरुस्तीबाबतचा शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो १११४/प्र.क्र.५२/पापु-७ दिनांक १७.१०.२०१४

५) कार्यकारी अभियंता, ग्रा.पा.पु.वि., जि.प., रायगड यांचे तांत्रिक मान्यता आदेश क्र.राजिप/ग्रापापु/तांत्रिक/६३३अ/प्रशा-४, दि.२६ एप्रिल, २०१८

६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड यांचे पत्र क्र. राजिप/ग्रापापु/वशी/प्रशा-४/७२१/२०१८, दि. २८/५/२०१८.

७) शासन निर्णय क्रमांक ग्रापाधो-२०१७/प्र.क्र. ५३/पापु-०७, दिनांक ०९ मार्च, २०१८.

**प्रस्तावना :-**

**मौजे वाकळघर, ता.श्रीवर्धन, जि. रायगड या पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, रायगड यांनी दि.२६ एप्रिल, २०१८ रोजी तांत्रीक मान्यता दिली आहे. प्रस्तुत पाणी पुरवठा योजनेचा दरडोई खर्च हा जिल्हा परिषदेच्या विहीत निकषापेक्षा जास्त असल्यामुळे सदर नळ पाणी पुरवठा योजनेस मंजूरी देण्यासाठीचा प्रस्ताव रायगड जिल्हा परिषदेने शासनाच्या मान्यतेकरीता सादर केलेला आहे. त्यामुळे वाढीव दरडोई खर्च असलेल्या मौजे वाकळघर ता. श्रीवर्धन, जि. रायगड या पाणी पुरवठा योजनेस प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.**

**शासन निर्णय :-**

**मौजे वाकळघर ता. श्रीवर्धन, जि. रायगड या नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. ५१०४/- एवढया दरडोई खर्च असलेल्या योजनेच्या रु. २२,३०,२४८/- (अक्षरी रुपये बावीस लक्ष तीस हजार दोनशे अठ्ठेचाळीस फक्त) इतक्या ढोबळ किमतीच्या अंदाजपत्रकास व आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

२. संदर्भाधिन अनु क्र.३ मधील शासन निर्णयाद्वारा ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी आकारण्यात येत असलेली लोकवर्गणी पूर्णत: रद्द करण्यात आलेली आहे. त्यामुळे प्रस्तुत योजनेच्या अंमलबजावणीसाठी शासनाकडून वितरित करण्यात येणारा निधी हा संदर्भाधिन अनु क्र.३ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे राहील.

**३. सदर योजनेस खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.**

१. सदर योजनेची अंमलबजावणी जिल्हा परिषद, रायगड यांनी करावी. योजना पुर्ण झाल्यानंतर ती यशस्वीरित्या पूर्ण झालेली आहे, यांची खात्री जिल्हा परिषदेने करावयाची असून योजना पुर्ण होऊन चाचणी झाल्यानंतर योजनेची देखभाल दुरुस्ती जिल्हा परिषद/ शिखर / संयुक्त समिती यांनी संदर्भाधिन अनु.क्र.४ मधील शासन निर्णयात नमूद केल्याप्रमाणे करण्यात यावी.

२. योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती यासाठी येणारा खर्च भागविण्याकरिता संबंधीत ग्रामपंचायतीने योजनेच्या अंमलबजावणीसाठी किमान **रु.११००/- प्रति वर्ष प्रति कुटुंब एवढी पाणीपट्टी निश्चित करावी व कालपरत्वे त्यात वाढ करण्यात यावी. सदर पाणीपट्टी भरण्यास ग्रामस्थ तयार आहेत याची खात्री मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, रायगड यांनी स्वत: करावी.** योजना चालविणे व देखभाल दुरुस्ती यासाठी शासनातर्फे अनुदान देण्यात येणार नाही.

३. योजनेचे स्त्रोत बळकटीकरण करण्यात यावे. योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळजोडण्यांचा समावेश करण्यात यावा.

४. कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास वाढीव खर्चापोटी शासकीय अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

५. गाव हागणदारीमुक्त करण्याबाबत प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६. योजनेची कामे कालबध्द व नियोजनबद्ध पद्धतीने करण्यात यावीत.

७. योजनेतील कामे टप्प्या-टप्प्याने करावीत. उद्भव विकसीत झाल्याशिवाय इतर कामे करु नयेत. (उद्भवामध्ये पुरेसे पाणी उपलब्ध असल्याची खात्री केल्यानंतरच योजनेतील इतर कामे करावीत.)

८. जास्त किंमतीच्या निविदा स्वीकृत करण्यापुर्वी पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची पूर्व परवानगी घ्यावी. विभागाची परवानगी प्राप्त झाल्याशिवाय योजनेची कामे सुरु करण्यात येऊ नये.

९. अस्तित्वातील स्त्रोतांचे बळकटीकरण करण्यात यावे.

१०. योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणी पट्टी बसविणे व त्यात वाढ करणे बंधनकारक राहील, याबाबत जिल्हा परिषदेच्या अधिका-यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना सविस्तर माहिती स्पष्टपणे दयावी, व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरवात करावी.

११. सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेतील अटींची, राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांच्या तसेच संदर्भाधिन अनु.क्र. २ मधील शासन निर्णयातील मार्गदर्शक तत्वांची पुर्तता करण्यात यावी.

४. या योजनेवर होणारा खर्च जिल्हा परिषदेला प्राप्त होणाऱ्या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत केंद्र तथा राज्य निधीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६२०१३०९५७०८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Deelip Pandurang Patil

Digitally signed by Deelip Pandurang Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3810fd2c32f3841df60ca68a27ae50fdbc9fd6c506fd334325871d684bf3eef9, cn=Deelip Pandurang Patil
Date: 2018.06.20 13:14:38 +05'30'

( दिलीप पां.पाटील )
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व मा.विधानसभा/विधानपरिषद सदस्य.
४. प्रधान सचिव,पा.पु.व स्व.वि.,मंत्रालय,मुंबई.
५. महालेखापाल,महाराष्ट्र-१,मुंबई (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
६. महालेखापाल,महाराष्ट्र-२,नागपूर (लेखापरिक्षा व अनुज्ञेयता).
७. विभागीय आयुक्त, कोकण विभाग,
८. सदस्य सचिव,मजीप्रा,मुंबई.
९. जिल्हाधिकारी, रायगड.
१०. संचालक,भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,पुणे.
११. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद, रायगड.
१२. संचालक,पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था,सिडको भवन,बेलापूर
१३. मुख्य अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, कोकण विभाग,ठाणे
१४. जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक,भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, रायगड.
१५. अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिरकण मंडळ, पनवेल
१६. कार्यकारी अभियंता,ग्रामीण पाणी पुरवठा विभाग,जिल्हा परिषद, रायगड.
१७. मु.अ.तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुबई.
१८. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग कार्यासन क्र. ०४, ०७,१३, १७, १८ व १९.
१९. निवडनस्ती पापु-०६,पा.पु.व स्व.वि.मंत्रालय,मुंबई.